**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र.४१/३अे**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक ०५ जानेवारी, २०१७**

प्रस्तावना –

बदलत्या परिस्थितीत शेतक-यांना उत्पादन वाढीसाठी प्रोत्साहन देण्यास अनन्यसाधारण महत्व आहे. प्रयोगशील व प्रगतीशील शेतकऱ्यांचे माध्यमातुन शेतक-यांना आपआपसातील विचारांची देवाणघेवाण करण्यास व्यासपीठ उपलब्ध करुन दिल्यास त्यांच्यातील आत्मविश्वास वृध्दींगत होऊ शकतो. आधुनिक कृषि तंत्रज्ञानाचा शाश्वत पध्दतीने अवलंब केल्यास शेतकरी आर्थिक दृष्टया उन्नत होऊन जागतिक पातळीवरील स्पर्धाक्षम वातावरणात आपले स्थान सिद्ध करु शकतील. याकरीता राज्यातील ३४ जिल्हयात कृषि महोत्सवाचे आयोजन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

तदनुषंगाने महाराष्ट्र शासनाचा सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाचा अर्थसंकल्प विधानसभेला सादर करताना मा. मंत्री ( वित्त ) यांनी दि. १८ मार्च, २०१६ रोजी जिल्हा कृषि महोत्सव या १००% राज्य योजनेची घोषणा केली होती. तदनुसार सदर योजनेस मान्यता देण्याच्या प्रस्तावास मंत्रीमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार शासनाने खालील निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

शेतकऱ्यांना शासनाच्या विविध कृषि योजना/उपक्रमांची माहिती, संशोधित कृषि तंत्रज्ञान, नाविन्यपुर्ण प्रयोगशील शेतकऱ्यांचे अनुभव, बाजारपेठ व्यवस्थापन, कृषि पुरक व्यवसाय इत्यादीबाबतचे मार्गदर्शन उपलब्ध व्हावे. कृषि प्रदर्शन, कृषि विषयक परिसंवाद आणि अनुभवी शेतकरी/उद्योजकांची व्याख्याने, यशस्वी शेतकरी, शास्त्रज्ञ, तंत्रज्ञ व विचारवंत यांची थेट भेट घडावी व सामान्य शेतकऱ्यांना शंका निरसन करून घेता यावे. उत्पादक ते ग्राहक थेट विक्री या संकल्पनेवर आधारीत धान्य व खादय महोत्सव तसेच फळे, फुले व भाजीपाला महोत्सव इत्यादीचे आयोजन करण्यासाठी मुंबई व मुंबई उपनगर जिल्हे वगळता राज्यातील उर्वरित जिल्हयांमध्ये दरवर्षी ५ दिवसांचा जिल्हा कृषि महोत्सव साजरा करण्याच्या राज्य योजनेस शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. जिल्हा कृषि महोत्सव योजनेचा उद्येश, महोत्सवाचे स्वरुप व योजनेचे घटक यांचा तपशील खालीलप्रमाणे असेल.

अ) **योजनेचा उद्देश :-**

- कृषि विषयक विकसीत तंत्रज्ञान व शासकीय योजनांची माहिती शेतकऱ्यांपर्यत पोहोचविणे.
- शेतकरी-शास्त्रज्ञ आणि संशोधन-विस्तार-शेतकरी-विपणन साखळी सक्षमीकरण.
- समुह/गट संघटीत करुन स्थापीत शेतकरी उत्पादक कंपन्यांची क्षमता बांधणी करणे.

- शेतकऱ्यांच्या उत्पादनास योग्य भाव मिळावा, ग्राहकांना उच्च दर्जाचा माल मिळावा याकरीता शेतकरी ते ग्राहक थेट विक्री श्रृंखला विकसीत करणे.
- कृषि विषयक परिसंवाद/व्याख्याने यांचे माध्यमातुन विचारांच्या देवाणघेवाणीद्वारे शेतकऱ्यांच्या समस्यांचे निराकरण करणे.
- विक्रेता-खरेदीदार संमेलनाच्या माध्यमातुन बाजाराभिमुख कृषी उत्पादनास आणि विपणनास चालना देणे.

**ब) कृषि महोत्सवाचे स्वरूप :-**

कृषि महोत्सव आयोजित करताना महोत्सवाचे स्वरूप कसे असावे, विविध समित्यांचे गठन व सदस्यांच्या जबाबदाऱ्या, महोत्सवाची जाहिरात, अंदाजपत्रक, प्रदर्शन मांडणीपासून यशस्वी करेपर्यंत ची प्रक्रिया याबाबतचा तपशील खाली देण्यात आला आहे. सर्वसाधारणपणे प्रत्येक जिल्ह्यामध्ये या महोत्सवाचे स्वरूप सारखेच ठेवल्यास त्याव्दारे शासनाच्या कृषि तसेच अन्य विभागांतील नाविन्यपूर्ण व महत्त्वाच्या योजना / कार्यक्रमांच्या ग्रामीण /निमशहरी भागात प्रचार व प्रसारासाठी व्यासपीठ उपलब्ध होणार आहे. प्रत्येक जिल्हयाची विविध भौगोलिक परिस्थिती व हवामान तसेच पीकपद्धती व तंत्रज्ञानाची प्राथमिकता यानुसार प्रात्यक्षिके व चर्चासत्रांच्या विषयामध्ये स्थानिक आवश्यकतेनुसार बदल होतील.

**क) कृषि महोत्सव योजनेचे घटक :-**

१) **कृषि प्रदर्शन** कृषी महोत्सवातील कृषी प्रदर्शन हा महत्वाचा घटक असून यामध्ये शासकीय दालन, विविध कंपन्यांचे स्टॉल्स, खाद्य पदार्थांचे स्टॉल्स, प्रात्यक्षिके यांचा समावेश आहे. जिल्हास्तरावर कृषि आणि पुरक व्यवसायाशी निगडीत एकात्मिक शेती पध्दती संकल्पनेवर आधारित प्रदर्शनाचे आयोजन करण्यात येईल. यामध्ये कृषि संबंधीत कृषि तंत्रज्ञान विभाग, कृषि विद्यापीठे, कृषि विज्ञान केंद्र, संबंधीत विविध कृषि महामंडळे यांचा सक्रिय सहभाग राहील. शासकीय यंत्रणा बरोबरच खाजगी कंपन्या, उद्योजक, बचत गट, शेतकरी उत्पादक कंपन्या यांचा सहभाग घेण्यात येईल.

२) **परिसंवाद /चर्चासत्र :-** कृषि शास्त्रज्ञ, कृषि व संलग्न विभागातील तज्ञ अधिकारी, विविध पुरस्कार प्राप्त/ प्रयोगशील शेतकरी, प्रक्रिया उद्योजक, यशस्वी महिला शेतकरी/उद्योजिका यांची व्याख्याने आयोजीत करण्यात येतील.

३) **उत्पादक ते ग्राहक थेट विक्री केंद्र :-** जिल्हयातील शेतकऱ्यांनी उत्पादीत केलेल्या दर्जेदार मालाची विक्रीद्वारे श्रृंखला विकसीत करण्यास प्रोत्साहन देण्यात येईल.

४) **विक्रेता खरेदीदार संमेलन:-** विविध सार्वजनिक खाजगी भागिदारीतुन (पी.पी.पी.) चालु प्रकल्प, कृषि माल प्रक्रिया उद्योजक आणि शेतकरी उत्पादक कंपन्या यांच्या एकत्रित सुसंवादाकरीता सर्व घटक एका व्यासपीठावर आणुन बाजाराभिमुख कृषि विस्ताराला चालना देणे.

५) **शेतकरी सन्मान समारंभ :-** जिल्हयातील कृषि व संलग्न क्षेत्रात उल्लेखनीय कामगिरी केलेले शेतकरी तसेच पिक स्पर्धा विजेते शेतकरी यांचा प्रशास्तीपत्रासह यथोचीत सन्मान करुन स्मृती चिन्ह वितरण करणे.

३. जिल्हा कृषि महोत्सवाअंतर्गत कृषी प्रदर्शन व धान्य महोत्सव आयोजनाबाबतचा सविस्तर तपशील सोबतच्या **" परिशिष्ट- अ "** नुसार राहील.

४. राज्याच्या कृषि तंत्रज्ञन व्यवस्थापन यंत्रणा (आत्मा) ATMA § Agriculture Technology Management Agency या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील स्थापन करण्यात आलेल्या आत्मा नियामक मंडळामार्फत जिल्हा कृषि महोत्सवाचे आयोजन करण्यात येईल. जिल्हा कृषि महोत्सव आयोजनाकरिता आत्मा नियामक मंडळाची रचना /स्वरुप, अध्यक्ष, सदस्य व सदस्य सचिव यांच्या कामांची विभागणी याबाबतचा तपशील सोबतच्या " **परिशिष्ट- ब** " नुसार राहील.

## ५. कृषि महोत्सवाचा कार्यकाल, हंगाम

प्रस्तावित जिल्हा कृषी महोत्सव ५ दिवसांचा असेल तसेच महोत्सवाची तारीख ऑक्टोबर ते मार्च या दरम्यान घेतल्यास यावेळी पावसाची शक्यता कमी प्रमाणात असते. या दरम्यानच्या काळामध्ये शक्यतो स्थानिक पिक पद्धतीनुसार शेतकऱ्यांकडे वेळ उपलब्ध असेल असा काळ निवडावा. महोत्सवादरम्यान रविवार तसेच सार्वजनिक सुट्या येतील अशा तारखा निवडाव्यात. यादरम्यान स्थानिक पातळीवर मोठा उत्सव / सण तसेच राज्यातील वेळोवेळी होणाऱ्या विविध प्रकारच्या निवडणूकांचा आचारसंहिता कालावधी या बाबी आत्मा नियामक मंडळाने विचारात घ्यावात.

## ६. महोत्सव स्थळ–

महोत्सवासाठी जिल्ह्याच्या ठिकाणी किमान अडीच ते तीन एकर समतल जागा निवडावी. स्थळ निश्चित करताना सदर मैदानावर यापूर्वी प्रदर्शने अथवा महोत्सव झाले असतील अशी मैदाने अथवा जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांची प्रदर्शने ज्या मैदानावर होतात अशा मैदानांना प्राधान्य देण्यात यावे. असे मैदान उपलब्ध न झाल्यास मैदान निवडताना शेतकऱ्यांमध्ये परिचित असावे, शहराच्या मध्यवर्ती ठिकाणी असावे, शेतकऱ्यांना सहज पोहोचता यावे, जवळपास सार्वजनिक वाहतुकीची साधने उपलब्ध असावीत असे ठिकाण निवडावे. महोत्सव स्थळावर ध्वनिक्षेपकाचा वापर केला जाणार असल्यामुळे या मैदानापासून जवळ न्यायालय, रुग्णालय, शाळा महाविद्यालय, प्रार्थनास्थळ नसावे. मैदान जर शाळा किंवा महाविद्यालयाची असेल तर शक्यतो सुट्यांचा दिवस निवडावा. महोत्सव स्थळ शक्यतो मोफत स्वरूपामध्ये असावे.

## ७. जिल्हा कृषि महोत्सव कार्यक्रम आयोजन :

प्रस्तावित कृषी महोत्सव कार्यक्रमाचा किमान ५ दिवसांचा कालावधी, त्यातील विविध विषयांवरील विविध कार्यक्रमांची संख्या, प्रत्येक वेगवेगळया प्रकारच्या कार्यक्रमांच्या आयोजनासाठी करावी लागणारी वेगळी तयारी या बाबींचा आढावा घेउन जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, आत्मा नियामक मंडळ यांनी जिल्हा कृषि महोत्सवाच्या

आयोजनासाठी जिल्हयातील शासन यंत्रणा सक्षम व पुरेशी असल्यास सदर शासन यंत्रणेमार्फत जिल्हा कृषि महोत्सवाचे आयोजन करावे. अन्यथा व्यावसायिक व अनुभवी इव्हेंट कंपन्यांची ( Event Companies ) च्या मदतीने कृषि महोत्सवाचे आयोजन करण्यात यावे. याकरिता शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. मावज-२०१५/प्र.क्र.३५०/३४, दि.१९.१०.२०१५ अनुसार शासनाच्या विविध विभागांच्या योजनांसाठी प्रसिध्दी तसेच जाहीरात विषयक कामे पार पाडण्यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने ई-निविदा मागवून मान्यता दिलेल्या व्यावसायिक अर्हताप्राप्त १० संस्था (Empaneled Agencies) मधून सुयोग्य इव्हेंट कंपन्यांची जिल्हा कृषि महोत्सव आयोजनासाठी निवड करण्यात यावी.

**८. आर्थिक तरतूद:-**

जिल्हा कृषि महोत्सव योजना ही १००% राज्य योजना राज्यात सन २०१८-१९ पर्यंत राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सन २०१६-१७ या चालू आर्थिक वर्षात मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळता उर्वरित ३४ जिल्ह्यांकरीता कृषि महोत्सव आयोजनाकरीता रु. २०.०० लाख प्रति जिल्हा याप्रमाणे एकुण रक्कम रु. ६८०.०० लाख एवढी तरतूद प्रस्तावित करण्यात आली आहे. सदर योजनेअंतर्गत कार्यक्रम आयोजनावरील खर्चाच्या/ मानधनाच्या रकमा DBT ( Direct Benefit Transfer ) व्दारे तात्काळ प्रदान करण्यात येतील.

९. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, आत्मा नियामक मंडळ यांनी जिल्हा कृषि महोत्सव आयोजनाचे अहवाल आयुक्त ( कृषि) यांना कार्यक्रम आयोजनानंतर १ महिन्यात सादर करावेत. सदर प्राप्त अहवाल विचारात घेवून आयुक्त ( कृषि ) यांनी सदर योजनेचा आढावा घेवुन सदर योजनेच्या मूल्यमापनाचा वार्षिक अहवाल शासनास सत्वर सादर करावा. सदर योजना मूल्यमापनासाठीचे निकष आयुक्त ( कृषि ) यांनी त्यांचेस्तरावर निश्चित करावेत.

१०. हा आदेश नियोजन विभाग यांच्या सहमतीने तसेच वित्त विभाग यांच्या अनौपरिक संदर्भ क्र.२३९/२०१६/व्यय-१, दि.२०.१२.२०१६ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०५१७११०१२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.01.05 18:01:38 +05'30'

**( सु.सं.धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा नियामक मंडळ ( आत्मा)

२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, तथा अध्यक्ष, जिल्हा नियामक मंडळ ( आत्मा)

३) सर्व जिल्हा प्रकल्प संचालक, आत्मा तथा सदस्य सचिव जिल्हा कृषि महोत्सव संयोजन समिती

४) सर्व सदस्य, जिल्हा कृषि महोत्सव संयोजन समिती

**प्रत –**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव

४) मा.मंत्री ( वित्त ) यांचे खाजगी सचिव

५) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव

६) मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव

७) मा.मुख्य सचिव

८) सर्व अपर मुख्य सचिव / सर्व प्रधान सचिव / सर्व सचिव, मंत्रालय.

९) सर्व विभागीय आयुक्त.

१०) आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

११) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१ मुंबई, महाराष्ट्र २ नागपूर

१२) महालेखापाल, ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१ मुंबई, महाराष्ट्र २ नागपूर

१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क अधिकारी, मुंबई.

१४) आयुक्त, पशुसंवर्धन, औंध, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१४) आयुक्त, दुग्धव्यवसाय विभाग,आरे कॉलनी, गोरेगाव, मुंबई

१५) आयुक्त, मत्स्य व्यवसाय विकास, तारापोरवाला मत्स्यालय, मरीन ड्राईव्ह, मुंबई

१६) साखर आयुक्त, पुणे,

१७) सहकार आयुक्त, पुणे

१८) कुलगुरु, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,

१९) कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,

२० ) कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहमदनगर,

२१) कुलगुरु, डॉ.बाळासाहेब सावंत कोंकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी,

२२) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, भोसले नगर, भांभुर्डा, पुणे -७

२३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, उद्योग सारथी, महाकाली गुंफा मार्ग, अंधेरी ( पूर्व) मुंबई-९३

२४) संचालक रेशीम उद्योग संचालनालय, प्रशासकीय इमारत इमारत क्र.२, ६ वा माळा, विभागीय आयुक्त कार्यालय परिसर, सीव्हील लाइन्स, नागपूर

२५) संचालक,सी.आय.सी.आर, नागपूर

२६) संचालक, संत्रा संशोधन केंद्र, नागपूर ( सी.आय.सी.सी.)

२७) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, प्लॉट नं.आर-७, मार्केटयार्ड, गुलटेकडी, पुणे-३७

२८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, राजन हाउुस, प्रभादेवी, सेच्युरी बाजार जवळ, मुंबई-२५

२९) व्यवस्थापकीय संचालक, महाबीज, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, मर्या., महाबीज भवन, कृषि नगर, अकोला- ४४४ १०४

३०) व्यवस्थापकीय संचालक, राज्य मार्केटींग फेडरेशन, मुंबई ,

३१) व्यवस्थापकीय संचालक, खादी ग्रामोद्योग

३२) व्यवस्थापकीय संचालक, नॅशनल हॉर्टीकल्चर मिशन, पुणे,

३३) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थीक विकास महामंडळ,

३४) व्यवस्थापकीय संचालक, महाग्रेप्स, ई-५, निसर्ग, मार्केटयार्ड, गुलटेकडी, पुणे- ३७

३५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या., कृषि उद्योग भवन, दिनकरराव देसाई मार्ग, आरे दुग्ध वसाहत, गोरेगाव ( पूर्व ) मुंबई-६५

३६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, ५३९/बी, मार्केटयार्ड, गुलटेकडी, पुणे-३७

३७) प्रकल्प संचालक, MACP, महाराष्ट्र कृषि स्पर्धाक्षम प्रकल्प, Plot No.F/E/७८, पहिला मजला, LDB, Trg. centre बिल्डिंग, मार्केट यार्ड, गुलटेकडी, पुणे- ३७

३८) कार्यकारी अधिकारी, एम.आय.डी.सी .लिमिटेड, मुंबई.

३९) सर्व संचालक, महाराष्ट्र राज्य, कृषि आयुक्तालय, पुणे

४०) वित्त विभाग/ कार्या.व्यय-१, मंत्रालय, मुंबई

४१) नियोजन विभाग/ कार्या.१४३१, मंत्रालय, मुंबई

४२) सर्व विभागीय कृषि सहसंचालक

४३) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

४४) सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद.

४५) सर्व मंत्रालयीन विभाग

४६) कृषि व पदुम विभाग/ कार्या.२ अे, मंत्रालय, मुंबई

४७) निवड नस्ती /कार्या.३ अे कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * *

**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र.४१/३अे, दि.०५.०१.२०१७ सोबतची " परिशिष्टे-अ व ब "**

# " परिशिष्ट- अ "

- <u>कृषि प्रदर्शनात समाविष्ट करावयाची दालने :</u>

शासकीय दालनामध्ये ४० स्टॉल्स, कृषी निविष्ठा ३० , कृषी तंत्रज्ञान व सिंचन ३०, गृहोपयोगी वस्तू ४०, धान्यमहोत्सव २०, खाद्य पदार्थ २० अशा एकूण अंदाजे २०० स्टॉल्सचा समावेश असेल. शासकीय दालनामध्ये शासनाच्या विविध योजनांची माहिती व उपक्रम यांचे स्टॉल्स असतील त्यापैकी काही स्टॉल्स मोफत स्वरूपात व काही स्टॉल्स हे प्रायोजकत्व निधीच्या बदल्यात आरक्षित करण्यात येतील. **या कार्यक्रमाकरिता खालील शासकीय विभाग/कार्यालये/यंत्रणांच्या दालनांना (स्टॉल्स) प्राधान्य देण्यात यावे.**

- कृषि विभागाच्या विविध योजना (उदा. प्रधानमंत्री फसल बिमा योजना, शेतकरी अपघात विमा योजना, जलयुक्त शिवार अभियान, आत्मा, माहिती विभाग, प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना, रा.कृ.वि.यो, यांत्रिकीकरण),
- संबंधित विभागातील कृषी विद्यापीठ, ( विस्तार व प्रशिक्षण)
- संबंधीत जिल्ह्यांतील जिल्हा परिषदेचा कृषि विभाग- (विविध लोक कल्याणकारी योजना)
- महसूल विभाग- ( सुवर्ण जयंती राजस्व अभियान, विविध लोक कल्याणकारी योजना)
- समाजकल्याण विभाग - ( विविध लोक कल्याणकारी योजना )
- आरोग्य विभाग- ( म.फुले जनआरोग्य योजना)
- सामाजिक वनीकरण महासंचालनालय - (वृक्ष तोड प्रतिबंध जनजागृती)
- जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा- ( विविध लोककल्याणकारी योजना )
- विविध संशोधन केंद्रे- ( सुधारीत, संशेधित व विकसीत वाण व तंत्रज्ञान यांचा प्रचार प्रसार)
- विविध कृषी विज्ञान केंद्रे- (अव्यावसायिक लोककल्याणकारी उपक्रम)
- ग्रामीण विकास विभाग- ( विविध लोक कल्याणकारी योजना)
- स्वच्छ भारत अभियान,
- तंटामुक्ती अभियान

**तसेच खालील उपक्रम/ विभागांच्या दालनांचाही समावेश असावा.**

- महाराष्ट्र फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ,
- महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ,
- महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ,
- महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ,
- महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ,
- महाराष्ट्र राज्य मत्स्योद्योग विकास महामंडळ,
- महाराष्ट्र राज्य पशुसंवर्धन विभाग,
- महाराष्ट्र पशुधन विकास महामंडळ,

- वसुंधरा एकात्मिक पाणलोट विकास कार्यक्रम,
- महाराष्ट्र कृषी स्पर्धात्मक प्रकल्प,
- पुण्यश्लोक अहिल्यादेवी मेंढी व शेळी विकास महामंडळ,
- एन.सी.डी.ई.एक्स,
- रेशीम विकास विभाग,
- नाबार्ड,
- भारतीय कृषि संशोधन परिषद,
- राष्ट्रीय कृषि विकास योजना,
- राष्ट्रीय सुगीपश्चात तंत्रज्ञान संस्था,
- अपेडा,
- संबंधीत जिल्ह्यांच्या अग्रणी बँका,
- संबंधीत जिल्ह्यांच्या मध्यवर्ती सहकारी बँका,
- संबंधीत जिल्ह्यांतील दुग्ध उत्पादन संस्था,
- बी.एस.एन.एल.,
- मेडा (महाउर्जा)

**धान्य महोत्सव** –

धान्य महोत्सवामध्ये २० स्टॉल्स शेतकरी गटांना/ शेतकरी कंपनी / शेतकरी यांना प्रथम येणाऱ्यास प्रथम प्राधान्य या तत्वावर मोफत स्वरूपामध्ये देण्यात यावेत. शेतकऱ्यांसाठी मोफत स्टॉल्सचा लाभ व्यावसायिक प्रतिनिधी अथवा संस्था यांनी घेवू नये, याची संबंधित प्रकल्प संचालक आत्मा यांनी खबरदारी घ्यावी. सदरचा उपक्रम हा शेतकरी ते ग्राहक थेट विक्रीबाबतच्या शासन धोरणानुरुप शेतकऱ्यांना लाभदायक ठरेल याचे धान्य महोत्सवात नियोजन करावे. सदर धान्य महोत्सवात धान्य, कडधान्य, दुग्धजन्य पदार्थ, सेंद्रीय फळे व भाजीपाला यांची ग्राहकास थेट विक्री होईल याची व्यवस्था करण्यात यावी.

**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र.४१/३अे, दि.०५.०१.२०१७ सोबतचे**

# " परिशिष्ट- ब "

**<u>जिल्हा कृषि महोत्सव आयोजनासाठी आत्मा नियामक मंडळाच्या समितीच्या अध्यक्ष व सदस्यांची कार्यविभागणी –</u>**

- जिल्हाधिकारी - **अध्यक्ष**
- जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी- सदस्य
- प्रकल्प संचालक - आत्मा - **सदस्य सचिव**
- जिल्हा माहिती अधिकारी - सदस्य
- जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी - सदस्य
- कृषी विकास अधिकारी संबंधित जिल्हा परिषद - सदस्य
- मान्यताप्राप्त इव्हेंट कंपनीचे आयोजक

**जिल्हाधिकारी - अध्यक्ष**

**कार्य विभागणी :**

१) जिल्हा कृषि महोत्सव आयोजनाबाबत सदस्य सचिव म्हणून जिल्हयाचे प्रकल्प संचालक, आत्मा यांचेसमवेत जिल्हा कृषि महोत्सवाच्या आराखडयास अंतीम स्वरुप दयावे.

२) कोणत्याही प्रकारच्या निवडणूकांचा आचारसंहिता कालावधी वगळता अन्य कालावधीत प्रशासकीय सोयीनुसार उपलब्ध शासन यंत्रणा अथवा इव्हेंट कंपनी यांच्या समन्वयाने महोत्सवाची तारीख ठरविणे कार्यक्रमाचा कालावधी ठरविण्यात यावा.

३) कृषि महोत्सवासाठी सुयोग्य व सवलतीच्या दरातील स्थळ निवड करणे.

४) जिल्हा कृषि महोत्सव आयोजनासंदर्भात स्थानिक स्तरावरील उपस्थित अडचणींचे निरसन करणे. शासकीय दालनातील सर्व सहभागी स्टॉलधारकांशी समन्वय ठेवून सर्वांना स्टॉल सजविण्यासाठी सूचना देणे. व त्याव्दारे शासकीय दालनातील सर्व सहभागी उपक्रम व योजना यांची माहिती शेतकऱ्यांना व्यवस्थित उपलब्ध होईल याची खात्री करणे.

५) विविध प्रशासकीय विभागांबरोबर समन्वय ठेवून विविध परवाने काढणे. तसेच स्थानिक प्रशासन, कायदा व सुव्यवस्था, स्वच्छता, आपत्कालीन व्यवस्था (अग्नियंत्रण, रुग्णवाहिका, प्रथमोपचार पथक) इत्यादी सुविधा पुरविण्यासाठी संबंधिताना आवश्यकतेनुसार सूचित करावे.

६) उभारणी शुभारंभ, उद्घाटन समारंभ, पुरस्कार वितरण सोहळा यांवेळी राजशिष्टाचार पालनाबाबत सर्व संबंधितांना सूचित करावे.

७) महोत्सवासाठी स्थानिक पातळीवरील स्टॉल बुकिंगसाठी सहकार्य करणे. (उदा. जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, जिल्ह्यातील अग्रणी बँक, संबंधित जिल्ह्यातील कृषी निविष्ठा, सिंचन साधने व औजारे यांचे उत्पादक, नर्सरी यांना सहभागी होण्यासाठी आवाहन करणे.)

८) जिल्हा कृषि महोत्सव आयोजनानंतर संयोजन समितीचे सदस्य सचिव म्हणून जिल्हयाचे प्रकल्प संचालक, आत्मा यांचेकडून कार्यक्रम आयोजनाचा अंतिम अहवाल घेउुन तो अभिप्रायांसह आयुक्त ( कृषि) यांचेमार्फत शासनास सादर करणे.

- **जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी- सदस्य**

**कार्य विभागणी :**

१) महोत्सवा दरम्यान संबंधित जिल्ह्यातील जिल्हा परिषद स्वखर्चाने पशु- पक्षी प्रदर्शन भरविण्यास तयार असल्यास अशा जिल्हा परिषदांना सहआयोजक म्हणून सहभागी करून घेणे. याबाबत पत्रव्यवहार करणे.
२) पशु- पक्षी प्रदर्शनासाठी मंडप, रिंगण, व्यासपीठ व ध्वनी व्यवस्था कार्यक्रम यंत्रणा अथवा इव्हेंट कंपनी करणार असून जिल्हा परिषदेला पशुधनाची ने-आण, चार, पाणी, बक्षिसे, पशुधन पालकांची जेवणाची व्यवस्था करणे आवश्यक आहे.
३) जिल्हा कृषि महोत्सवाच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी तयार करण्यात आलेले पोस्टर, बॅनर इत्यादी मटेरियल जिल्हा परिषदेकडील ग्रामपंचायत विभाग, पशुसंवर्धन विभाग, यांचे मार्फत प्रत्येक गावामध्ये लावले जातील याची शहानिशा करणे.
४) कृषि क्षेत्रातील नवनवीन तंत्रज्ञानाची शालेय विद्यार्थ्यांना ओळख व्हावी याकरिता, शिक्षण विभागामार्फत विद्यार्थी सहलीचे आयोजन करणे.
५) ग्रामपंचायत विभागामार्फत ग्रामपंचायतींच्या स्वीय निधीतून ग्रामपंचायत सदस्य व प्रगतशील शेतकरी यांच्या सदर महोत्सव कार्यक्रम भेटीसाठी आयोजन करणे.

- **प्रकल्प संचालक, आत्मा - सदस्य सचिव**

**कार्य विभागणी :**

१) जिल्हा कृषि महोत्सव आयोजन समितीचे सदस्य सचिव संयोजन समितीच्या बैठकीचे आयोजन व कार्यवृत्त तयार करणे. व कार्यक्रम यशस्वीतेसाठी संयोजन समितीच्या सर्व सदस्यांशी समन्वय ठेवणे.
२) धान्य महोत्सवामध्ये २० स्टॉल्स शेतकरी गटांना/ शेतकरी कंपनी / शेतकरी यांना प्रथम येणाऱ्यास प्रथम प्राधान्य या तत्वावर मोफत स्वरूपामध्ये देणे.
३) शेतकऱ्यांसाठी मोफत स्टॉल्सचा लाभ व्यावसायिक प्रतिनिधी अथवा संस्था यांनी घेवू नये, याची खबरदारी घेणे.
४) जिल्हा कृषि महोत्सव कार्यक्रमात सहभागी होणाऱ्या कृषि आणि संलग्न क्षेत्राशी निगडीत सर्व खाजगी कंपन्या, उद्योजक, कंपन्या इत्यादिंकडून जिल्हास्तरीय समितीने निर्धारित केलेल्या दरानुसार दालन उभारणीकरीता शुल्क आकारणी व वसुली करणे.
५) सदरचा उपक्रम हा शेतकरी ते ग्राहक थेट विक्रीबाबतच्या शासन धोरणानुरुप शेतकऱ्यांना लाभदायक ठरेल या दृष्टीने धान्य महोत्सवात नियोजन करणे.
६) सदर धान्य महोत्सवात धान्य, कडधान्य, दुग्धजन्य पदार्थ, सेंद्रीय फळे व भाजीपाला यांची ग्राहकास थेट विक्री होईल, याची व्यवस्था करणे.

७) जिल्हा कृषि महोत्सवाच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी पोस्टर, बॅनर इत्यादी मटेरियल तयार करण्यासंबंधित कामे.
८) जिल्हा कृषि महोत्सव आयोजनानंतर संयोजन समितीचे सदस्य सचिव म्हणून कार्यक्रम आयोजनाचा अंतिम अहवाल तयार करून तो जिल्हाधिकारी यांना सादर करणे
९) जिल्हा कृषि महोत्सव आयोजनाबाबत प्राप्त होणारा निधी संबंधितांस/ इव्हेंट कंपनीस ( नियुक्ती असल्यास) कार्यक्रमानंतर DBT- Direct Benefit Transfer व्दारे एक आठवडयात प्रदान करणे.

- **जिल्हा माहिती अधिकारी - सदस्य**

**<u>कार्य विभागणी</u> :**

१) जिल्हा कृषि महोत्सव कार्यक्रमाच्या स्थानिक पातळीवरून यथासांग प्रसिद्धीसाठी संबंधित यंत्रणा / इव्हेंट कंपनीसोबत जाहीरात नियोजन करणे.

२) उभारणी शुभारंभ, पुरस्कार निवडी व पुरस्कार विजेत्याने केलेले कार्य, पूर्वतयारी, आढावा बैठका, स्टॉल धारक सहभागी होण्यासाठी आवाहन, उद्घाटन समारंभ, पुरस्कार वितरण सोहळा, प्रतिसाद, नाविन्यपूर्ण बाबींचे वार्तांकन करून प्रसिद्धीस देणे.

- **जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी - सदस्य**

**<u>कार्य विभागणी</u> :**

१) महोत्सवामध्ये विविध चर्चासत्रांचे आयोजन करायचे असून संबंधित जिल्ह्यातील पिक पद्धती व तंत्रज्ञानाची गरज यानुसार चर्चासत्रांचे विषय व वक्ता स्थानिक पातळीवर ठरविण्यात यावेत. वक्ता ठरविताना शात्रज्ञ अथवा शेतकऱ्यांच्या बोली भाषेत मांडणी करू शकणारा यशस्वी शेतकरी याप्रमाणे विषय विभागणी करावी. चर्चासत्रामध्ये शेतकऱ्यांच्या शंकांचे निरसन होईल याची काळजी घेवून उपस्थित शेतकऱ्यांची नोंद घेवून ठेवावी. या चर्चासत्रामध्ये जास्तीत जास्त युवक व महिला शेतकरी सहभाग घेतील व विविध यंत्रणा मार्फत जास्तीत जास्त शेतकरी उपस्थित राहतील, असे नियोजन करावे.

२) जिल्हा कृषि महोत्सवाच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी तयार पोस्टर, बॅनर इत्यादी मटेरियल कृषि सहायकांमार्फत प्रत्येक गावामध्ये लावले जातील याची शहानिशा करणे.

३) कृषि विभागाच्या विविध योजना ( उदा. प्रधानमंत्री फसल बिमा योजना, शेतकरी अपघात विमा योजना, जलयुक्त शिवार अभियान, आत्मा, माहिती विभाग, यांत्रिकीकरण ) यांची उपलब्ध संकीर्ण निधीतून दालने उभारणे. यामध्ये जिल्हयातील विविध पिकांचे आदर्श नमुने संबंधित शेतकऱ्यांच्या यशोगाथेसह सादरीकरण करणे.

- **कृषी विकास अधिकारी संबंधित जिल्हा परिषद - सदस्य**

**<u>कार्य विभागणी</u> :** जिल्हा कृषि महोत्सव उदघाटन समांरभादरम्यान, जिल्हयातील विविध स्तरावरील पुरस्कार प्राप्त शेतकऱ्यांशी समन्वय ठेवून त्यांचा यथोचित सन्मानित करणे.